खाजगी व्यवस्थापनाच्या सहायक शिक्षक, शिक्षण सेवक इत्यादी नियुक्त्यांना मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार मान्यतेच्या कार्यवाहीबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः एसएसएन-२०१८/प्र.क्र.९४/१८/टीएनटी-२
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
तारीख: २४ ऑगस्ट, २०१८

वाचा :-

१) शासन निर्णय क्र. : एसएसएन-२०१८/(३६/०७)/माशि-२, दिनांक ०६/०२/२०१२
२) शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०११/(४४७/११)(अ)/प्राशि-३, दिनांक ०२/०५/२०१२
३) शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१२/(२०९/१२)(अ)/प्राशि-३, दिनांक ०६/०९/२०१२
४) शासन निर्णय क्र.व्हीएलएस-१४१३/(१४/१३)(अ)/प्राशि-३, दिनांक ०६/०५/२०१३
५) शासन निर्णय क्र.एसएसएन-२०१३/(१७/१३)(अ)/माशि-२, दिनांक ०४/०९/२०१३
६) शासन परिपत्रक क्र.एसएसएन-२०१८ /प्र.क्र.९४/१८/टीएनटी-२, दिनांक ०४/०४/२०१८

प्रस्तावना :

महाराष्ट्र खाजगी शाळा कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील तरतुदीनुसार संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक ०६/०२/२०१२ अन्वये कार्यपध्दती विहित करण्यात आलेली होती. दरम्यानच्या काळात दिनांक ३ ते ५ ऑक्टोबर,२०११ या कालावधीत राज्यात झालेल्या विशेष पटपडताळणी मोहिमेच्या अनुषंगाने संदर्भ क्रं २ च्या शासन निर्णयान्वये अतिरिक्त ठरलेले शिक्षक १०० टक्के समायोजित झाल्याशिवाय खाजगी किंवा स्थानिक स्वराज्य संस्थाच्या शाळांमध्ये नवीन शिक्षक किंवा शिक्षकेतर कर्मचारी भरती करु नये अशी तरतुद करण्यात आली होती. या बाबत कांही संस्थानी शासनाकडे केलेल्या सूचना व विद्यार्थाचे हित लक्षात घेता संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक ०६/०९/२०१२ अन्वये ज्या शाळांनी शासन मान्यतेने पदे भरण्याची कार्यवाही दिनांक २ मे २०१२ पुर्वी सुरु केली होती त्यांना या पद भरती बंदीतून सुट देण्यात आलेली आहे. तसेच संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक ६/५/२०१३ अन्वये माध्यमिक शाळांमध्ये गणित,इंग्रजी व विज्ञान या विषयाची व आरक्षणाची पदे रिक्त असल्यास व त्या त्या जिल्हयामध्ये त्या त्या विषयाचे व प्रवर्गाचे अतिरिक्त शिक्षक उपलबध होत नसल्यास संबंधित शिक्षणाधिकारी यांनी याबाबतची खात्री करुन विभागीय शिक्षण उपसंचालक यांच्या मार्फत प्रस्ताव सादर करण्याबाबत तरतुद करण्यात आलेली होती. त्यानुसार वेळोवेळी शासनाने पदभरतीस परवानगी दिली आहे. तसेच संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक ०४/०९/२०१३ अन्वये राज्यातील माध्यमिक शाळांतील गणित,इंग्रजी व विज्ञान या विषयाची १५९९ पदे भरण्यास परवानगी दिलेली आहे.

२. महाराष्ट्र खाजगी शाळा कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली १९८१ मधील तरतुदीनुसार संस्थांनी केलेल्या पदभरतीस शिक्षणाधिकारी हे शासन निर्णय दिनांक ०२/०५/२०१२ नुसार पदभरतीस अतिरिक्त शिक्षक असल्याचे नमुद करुन तसेच दिनांक ०२/५/२०१२ पुर्वी भरती सुरु केलेल्या मान्यता प्रकरणी, मागासवर्गीय आरक्षीत पदावरील मान्यता प्रकरणी, गणित,इंग्रजी व विज्ञान विषयाच्या मान्यता प्रकरणी मान्यता नाकारत असल्याने नियुक्त करण्यांत आलेल्या शिक्षकांनी मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे रिट याचिका क्र.१०५८०/२०१५ सोबत रिट याचिका क्र.११४५/२०१६ मधील दिनांक दि.०९/०३/२०१७ रोजी निर्णय, रिट याचिका क्र ८५८७/२०१६ व इतर मधील दिनांक १०/७/२०१७ रोजी निर्णय, रिट याचिका क्र ८५३२/२०१७ व इतर मधील दिनांक २३/८/२०१७ रोजी निर्णय दिलेला आहे. रिट याचिका क्र ८५८७/२०१६ मध्ये दिनांक १०/७/२०१७ रोजी निर्णय देताना त्यांच्या आदेशातील परिच्छेद क्र ९ ते ११ मध्ये खालील प्रमाणे निर्णय दिलेला आहे.

**9. In the result the Writ Petitions are allowed and impugned orders are quashed and set aside. The Respondents- Education Officers are directed to examine independent and grant approval to each of the teachers who fall in the following three categories**

**a) Where the recruitment process is already commenced prior to GR dated 2nd May 2012.**

**b) Where the appointments made for filling up vacancies in English, Mathematics and Science;**

**c) Where the recruitment is made to fulfill the backlog of reserve categories candidates;**

**10. The necessary orders after hearing the management and teachers be passed within a period of six weeks from today.**

**11. Needless to state that upon grant of approval necessary steps would be taken for paying salary to such of the teachers who are found eligible and salaries would be paid to them within a period of १२ weeks.**

३. तसेच मा.उच्च न्यायालयाने याचिका क्र.६२९८/२०१६ मध्ये दिनांक ५.२.२०१८ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सहायक शिक्षक, शिक्षण सेवक यांच्या नियुक्तीस मान्यता देण्याच्या प्रस्तावांवर आठ आठवडयांत निर्णय घेण्याच्या सूचना दिनांक ४.४.२०१८ च्या परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत. दरम्यान वैयक्तिक मान्यतेचे प्रस्ताव केवळ दिनांक २ मे, २०१२ नंतरची भरती असल्याचे कारण देऊन सक्षम प्राधिका-यांनी नाकारले असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे यासंदर्भात अधिक स्पष्ट सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वैयक्तिक मान्यतेच्या प्रस्तावांची छाननी करतेवेळी सक्षम प्राधिका-यांनी संबंधित व्यवस्थापन व शिक्षकांची सुनावणी घेऊन प्रचलित कार्यपध्दती बरोबरच खालीलप्रमाणे कार्यवाही करावी :-

१. संस्थांनी इंग्रजी, विज्ञान व गणित विषयातील नुियक्ती केली असल्यास, नियुक्तीच्या वेळी जिल्हयात सदर विषयाचा शिक्षक अतिरिक्त नाही याची खात्री करुन मान्यता देण्याची कार्यवाही करावी.

२. मागावर्गीय प्रवर्गातील नियुक्ती केली असल्यास सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय दिनांक १३/०४/२०११ व त्यानुसार वेळोवेळी देण्यात आलेली मुदतवाढ विचारात घेवून करण्यात आलेल्या नियुक्त्यांना मान्यता देण्याची कार्यवाही करावी.

३. अनुशेष पूर्ण होण्यापूर्वीची नियुक्ती असल्यास ज्या दिनांकास अनुशेष पूर्ण झाला आहे त्या दिनांकापासून मान्यता द्यावी.

४. संस्थेने नियुक्त केलेल्या जागेवर संस्थेकडून नियुक्ती देण्यापुर्वी विभागाने अतिरिक्त शिक्षक दिलेला असेल आणि संस्थेने दिलेला उमेदवार रुजू करुन घेतला नसेल तर अशा प्रकरणी मान्यता नाकारण्यात यावी.

५. वरीलप्रमाणे मान्यता देताना आरक्षण, बिंदुनामावली, अनुशेषानुसार पदभरती केलेली नसल्यास मान्यता देता येणार नाही.

६. शासन निर्णय दिनांक २३/०६/२०१७ नंतर शिक्षक भरती “पवित्र” प्रणालीमार्फत करण्यात येणार असल्याने त्यानंतरच्या शिक्षक पद भरतीस वैयक्तिक मान्यता देता येणार नाही.

७. वैयक्तिक मान्यतेसाठी प्रलंबित प्रस्तावांवर देखील वरीलप्रमाणे कार्यवाही करावी.

८. केवळ २ मे २०१२ नंतरची भरती असल्याचे कारण देऊन वैयक्तिक मान्यता नाकारल्या असल्यास त्या आदेशांचे पुनर्विलोकन करुन सुधारित आदेश द्यावेत.

९. वरीलप्रमाणे कार्यवाही करुन आठ आठवडयांच्या आत निर्णय घेऊन संबंधितांना कळवावा. वैयक्तिक मान्यता प्रस्ताव अमान्य करताना कोणतेही एकच कारण न देता वैयक्तिक मान्यता अमान्य करण्यासाठी विचारात घेतलेली सर्व कारणे स्पष्ट नमूद करावीत.

१०. वैयक्तिक मान्यताप्रकरणी दाखल असलेल्या रिट याचिकांमध्ये प्रकरणनिहाय शपथपत्र दाखल करुन न्यायालयीन प्रकरणे निकाली काढण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशाचा अवमान होणार नाही याची दक्षता घ्यावी.

११. उपरोक्त प्रमाणे कार्यवाही विहित मुदतीत न झाल्यामुळे न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास संबंधित अधिका-यांवर शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

४. सदर प्रकरणी सक्षम प्राधिकारी यांनी केलेल्या कार्यवाहीचा आढावा आयुक्त, शिक्षण यांनी वेळोवेळी घ्यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२४१७१३४८२७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Devendra Chaudhari

Digitally signed by Charushila Devendra Chaudhari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila Devendra Chaudhari
Date: 2018.08.24 17:19:10 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
उपसचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई,
२) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,

४) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
६) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक), जिल्हा परिषद,
७) सर्व शिक्षणाधिकारी, नगरपालिका/ महानगरपालिका,
८) शिक्षण निरिक्षक, बृहन्मुंबई (दक्षिण/पश्चिम/उत्तर),
९) निवडनस्ती (टीएनटी-२).